गोखले अर्थशास्त्र संस्था, पुणे या अभिमत विद्यापीठातील शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांना दिनांक १/१/२००६ पासून सहाव्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार सुधारीत वेतनश्रेणी लागू करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. - संकीर्ण-२०१०/(१९६/१०)/विशि-४**
**मंत्रालय विस्तार भवन, मुंबई- ४०००३२**
**दिनांक : २३ सप्टेंबर, २०१०**

**संदर्भ :-** १) उ.व तं.शि.वि शासन निर्णय क्र. आरएसआय२०००/(३७/२०००)/विशि-१, दि.०२ सप्टेंबर २००४.
२) उ.व तं.शि.वि. अधिसूचना क्र.संकीर्ण-२००९/(३२६/०९)/विशि-१, दि. ०७/१०/२००९
३) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य पुणे यांचे पत्र क्र. डीसीआय/२००८/विविधप्रस्ताव/विशि-१२४६ दि. २८/०५/२०१०

**प्रस्तावना :-**

गोखले राज्यशास्त्र व अर्थशास्त्र या संस्थेची स्थापना सन १९३० मध्ये झालेली असून अर्थशास्त्र विषयात संशोधन व प्रशिक्षण देणारी देशातील एक जूनी संस्था आहे. सदर संस्थेस विद्यापीठ अनुदान आयोगाद्वारे १९९३ मध्ये अभिमत विद्यापीठाचा दर्जा दिला आहे. त्यानंतर शासनाने विविध शासन निर्णायान्वये २७ शिक्षकीय व २४ शिक्षकेत्तर अशी एकूण ५१ पदे मंजुर केलेली आहे. १९९३ पूर्वी सदर संस्था ही पुणे विद्यापीठास संलग्न असल्याने अकृषी विद्यापीठें व शासकीय / अशासकीय महाविद्यालयातील शिक्षकीय / शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांना वेतन आयोग लागू झाल्याबरोबरच या संस्थेला देखील तो लागू होत असे. परंतु या संस्थेला अभिमत विद्यापीठाचा दर्जा प्राप्त झाल्यानंतर राज्य शासनाने उ.व तं.शि.वि शासन निर्णय क्र. आरएसआय२०००/(३७/२०००)/विशि-१, दि.०२ सप्टेंबर २००४ अन्वये संस्थेतील शिक्षकीय / शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांना दिनांक ०१/०४/२००४ पासून स्वतंत्रपणे पाचवा वेतन आयोग लागू केला आहे.

आता, शासनाने शासन अधिसूचना, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक : संकीर्ण-२००९/(३२६/०९)/विशि-१, दिनांक ०७/१०/२००९ अन्वये अकृषी विद्यापीठे व संलग्नित अशासकीय महाविद्यालयातील शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांना सहाव्या वेतन आयोग लागू करण्याचे आदेश निर्गमित केलेले आहेत. त्यानुसार गोखले अर्थशास्त्र संस्था, पुणे या अभिमत विद्यापीठाच्या आस्थापनेवरील २४ शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांना सहाव्या वेतन आयोगाच्या वेतनश्रेण्या लागू करण्याची बाब राज्य शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** गोखले अर्थशास्त्र संस्था, पुणे या अभिमत विद्यापीठातील ९ संवर्गातील २४ शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांना सोबत जोडलेल्या प्रपत्र 'अ' मध्ये नमूद केल्याप्रमाणे सुधारीत वेतन संरचना दिनांक ०१/०१/२००६

पासून मंजूर करण्यात येत आहे. मात्र सुधारीत वेतन संरचनेचा प्रत्यक्ष लाभ दिनांक ०१/०४/२०१० पासून रोखीने देण्यात यावा. तसेच दिनांक ०१/०१/२००६ ते ३१/०३/२०१० या कालावधीतील वेतन फरकाची थकबाकी संबंधीताना अनुज्ञेय राहणार नाही.

**वेतन निश्चिती :-** संचालक, गोखले अर्थशास्त्र संस्था, पुणे यांनी संबंधित कर्मचाऱ्यांची वेतन निश्चिती शासकीय अधिसूचनेच्या अनुषंगाने करावी व त्याला संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांची मान्यता घ्यावी.

**विकल्प देणे :-** सुधारीत वेतन श्रेणी स्विकारण्यासाठी संस्थेमधील कर्मचाऱ्यांनी या आदेशाच्या निर्गमनाच्या दिनांकापासून १ महिन्याच्या कालावधीत विकल्प द्यावा.

शिक्षण संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सुधारीत वेतन श्रेणीवरील खर्च सन २०१०-११ मधील मंजूर अनुदानातून भागवावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या संमतीने व त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ५७७/सेवा-९, दिनांक ०९/०९/२०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra .gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१०००९२३२११५१३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(रा. गो. जाधव)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. राज्यपाल तथा कुलपतीचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई (पत्राने)
२) मा. मुख्यमंत्र्यांचे खाजगी सचिव
३) मा. उपमुख्यमंत्र्यांचे खाजगी सचिव
४) मा. मंत्री (उ. व तं. शि.) यांचे खाजगी सचिव
५) मा. राज्यमंत्री (उ. व तं. शि.) यांचे खाजगी सचिव
६) मा. मुख्य सचिवांचे स्वीय सहाय्यक
७) महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मंत्रालय, मुंबई
८) शिक्षण संचालक, उच्च शिक्षण, पुणे विभाग, पुणे
९) शिक्षण सहसंचालक, उच्च शिक्षण, पुणे विभाग, पुणे
१०) संचालक, गोखले राज्यशास्त्र व अर्थशास्त्र संस्था, पुणे
११) महालेखापाल, लेखा व परिक्षा, महाराष्ट्र १, मुंबई
१२) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र १, मुंबई
१३) जिल्हा कोषाधिकारी, पुणे
१४) वित्त विभाग, व्यय-५/सेवा-९/अर्थ-६
१५) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, सर्व कार्यासने
१६) निवड नस्ती, विशि-१

**प्रपत्र - अ**

**शासनाच्या क्र. संकीर्ण-२०१०/(१९६/१०)/विशि-४, दिनांक २३ सप्टेंबर २०१० चे सहपत्र**

**गोखले राज्यशास्त्र आणि अर्थशास्त्र संस्था**

**शिक्षकेत्तर पदांच्या पाचव्या व सहाव्या वेतन आयोगातील वेतनश्रेण्या दर्शविणारे विवरण पत्र**

| अ.क | पदनाम | एकूण मान्य पदे | पाचव्या वेतन आयोगानुसार वेतनश्रेणी | सहाव्या वेतन आयोगानुसार सुधारीत वेतनश्रेणी | ग्रेड वेतन (GP) |
|---|---|---|---|---|---|
| १) | वरिष्ठ सांख्यिकी सहाय्यक | २ | ५०००-८००० | ९३००-३४८०० | ४२०० |
| २) | ग्रंथालय सहाय्यक | २ | ५०००-८००० | ९३००-३४८०० | ४२०० |
| ३) | टेक्नीकल स्टाफ | २ | ४०००-६००० | ५२००-२०२०० | २४०० |
| ४) | सहाय्यक लेखपाल | १ | ४०००-६००० | ५२००-२०२०० | २४०० |
| ५) | टंकलेखक वरिष्ठ | १ | ४०००-६००० | ५२००-२०२०० | २४०० |
| ६) | टंकलेखक / लिपीक | २ | ३२००-४९०० | ५२००-२०२०० | २००० |
| ७) | टॅब्यलेशन सहाय्यक | ४ | ४०००-६००० | ५२००-२०२०० | २४०० |
| ८) | लघुलेखक | २ | ५५००-९००० | ९३००-३४८०० | ४३०० |
| ९) | शिपाई | ८ | २५५०-३२०० | ४४४०-७७४० | १३०० |
| | | | २६१०-४००० | ४४४०-७७४० | १६०० |
| | | | ३०५०-४५९० | ५२००-२०२०० | १९०० |
| | एकूण | २४ | | | |

उप सचिव, महाराष्ट्र शासन